पंचायत समिती उदगीर (जि. लातूर) येथील नवीन प्रशासकीय इमारतीच्या विस्तारीकरणास व उपकामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०२३/प्र.क्र.४४/बांधकाम-४

५ वा मजला, मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१

तारीख : १५ मार्च, २०२३

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः** पंसई-२०१३/प्र.क्र.-९४/बांधकाम-४, दिनांक ०५ एप्रिल, २०२१.

२) **अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांचे पत्र क्रमांकः** जिपला/बांध/कार्या-०१/५३/२३, दिनांक ३१ जानेवारी, २०२३.

**प्रस्तावना :-**

अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांनी वाचा मधील अनुक्रमांक २ येथील पत्रान्वये, पंचायत समिती, उद्गीर (जि. लातूर) येथील नवीन प्रशासकीय इमारतीच्या विस्तारीकरणास व उपकामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

०२. उक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दिनांक ०५ एप्रिल, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये, पंचायत समिती, उद्गीर (जि. लातूर) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रू.९७५.५६ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. पंचायत समिती प्रशासकीय इमारतीमध्ये घरकुल विभाग, मनरेगा विभाग, बचत गट (MSRLM) विभाग ई. विभागासाठीचा समावेश नाही. तसेच, उक्त विभागासाठी फर्निचर व इतर उपकामे उदा. संरक्षण भिंत, रस्ता व नाली बांधकाम, अतिरिक्त मजल्यासाठी फायर फायटींग सिस्टिम ईत्यादीची अत्यंत आवश्यकता आहे. यास्तव, जिल्हा परिषद, लातूर (जि. लातूर) येथील पंचायत समिती उद्गीर इमारतीच्या विस्तारीकरणाचे व उपकामाचे बांधकाम भूमापन क्र. ३०५/१/४ या क्षेत्रावर करण्यात येणार आहे. कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, लातूर यांनी सदर पंचायत समिती, उद्गीर (जि. लातूर) येथील विसारीकरणाच्या बांधकामाकरिता व उपकामाकरीता, उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांच्याकडील जॉब नं.

LAT (४) २२, DRG. No. ०१ उपयोगात आणलेला आहे. पंचायत समिती, उद्‌गीर (जि. लातूर) प्रशासकीय इमारतीच्या विस्तारीकरणाच्या व उपकामाच्या बांधकामाचे सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारित रू.११६३.२४ लक्ष किंमतीचे सविस्तर अंदाजत्रक कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, लातूर, अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, लातूर व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड यांनी साक्षांकित केलेले आहे. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांनी प्रस्तावासोबत लीड चार्ट, क्वॅरी चार्ट, पंचायत समितीच्या ठरावाची प्रत इत्यादी कागदपत्रे सादर केलेली आहेत.

०३. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती, पंचायत समिती, उदगीर (जि. लातूर) येथील नवीन प्रशासकीय इमारतीच्या विस्तारीकरणाच्या व उपकामाच्या रू.११६३.२४ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पंचायत समिती, उदगीर (जि. लातूर) येथील नवीन प्रशासकीय इमारतीच्या विस्तारीकरणाच्या व उपकामाच्या रूपये ११,६३,२४,०००/- (रूपये अकरा कोटी त्रेसष्ठ लक्ष चौवीस हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांस पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. प्रस्तुत बांधकामास तांत्रिक मान्यता देण्यापुर्वी संकल्पन तपासून घेणे आवश्यक राहील.
२. प्रस्तुत इमारतीचे बांधकाम मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा. बां. मंडळ, मुंबई / उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सां. बा. प्रादेशिक विभाग यांच्याकडील विहित नमुना आराखड्यानुसार हाती घेण्यापूर्वी, स्थानिक नगररचना प्राधिकरणाची तसचे अग्निशमन यंत्रणेची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.
३. पंचायत समिती, उद्‌गीर (जि. लातूर), प्रशासकीय इमारतीकरिता शासन निर्णय, सा. बां. वि. क्र. सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर/मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करून घेणे बंधनकारक राहील.
४. नियोजित आराखड्यात महिला पदाधिकाऱ्यासाठी प्रसाधनगृहासह विश्रांती कक्षाचे संकल्पन करण्यात येवून, सदर व्यवस्था इमारतीमध्ये निर्माण करण्यात यावी.
५. प्रस्तुत प्रशासकीय इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुवीजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:र्भरण

आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

६. प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करून, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

७. या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

८. या कामी प्रशासकीय मान्यतेपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो संबंधित पंचायत समिती / जिल्हा परिषदेने सोसावा.

९. प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

१०.प्रत्यक्ष इमारतीचे बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग क्र.ईएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

०२. पंचायत समिती, उदगीर (जि. लातूर) येथील नवीन प्रशासकीय इमारतीच्या विस्तारीकरणाच्या व उपकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे.

| General Abstract For Extention & sub work of Udgir P. S. (Dist. Latur) Administrative Building | | |
|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of Item** | **Cost (In Rs.)** |
| **(A)** | Essential Items | |
| **1.** | a) Building proper | |
| | 3 rd Floor (783.30 sq. mt.) | 26329203.00 |
| | 4 th Floor (930.98 sq. mt.) | |
| | **Sub Total (a)** | **26329203.00** |
| | b) Furniture | 36963082.00 |
| | **Sub Total (b)** | **36963082.00** |
| **2.** | Add 5 % for Internal Electrification **Sub Total (2)** | 1316460.00 |
| **3.** | Add 4 % Fire Fighting Arrangement **Sub Total (3)** | 1053168.00 |
| | **Sub Total (A)** | **66774962.00** |
| **(B)** | **Miscellaneous Items** | |
| | (i) Coompound wall & Gate | 2830344.00 |
| | (ii) Internal Roads | 8789617.00 |
| | (iii) C. C. Drains & C/D works | 1753655.00 |
| | **Sub Total (B)** | **13373616.00** |
| | **Sub Total (A) + (B)** | **80148578.00** |
| **(C)** | **Optional Items** | |
| | 1) Air Conditioning | 500000.00 |
| | **Sub Total (C)** | **500000.00** |

| General Abstract For Extention & sub work of Udgir P. S. (Dist. Latur) Administrative Building | | |
|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of Item** | **Cost (In Rs.)** |
| | **Cost of Project (P) = (A) + (B) + (C)** | **50648578.00** |
| **(D)** | **Provisions** | |
| | (i) Add 4 % on P for Contingencies | 3225943.00 |
| | (ii) Green Building | 5482403.00 |
| | (iii) Add 18 % on P for GST | 14516744.00 |
| | (iv) Add 0.5 % on P for Labour Insurance | 403243.00 |
| | (v) Add 5 % on P for Increase in DSR | 4032429.00 |
| | (vi) Add 10 % for Price Escalation | 8064858.00 |
| | **Sub Total (D)** | **35725620.00** |
| | **Total Cost of Project (TPC) = (A+B+C+D)** | **116374198.00** |
| | **Says** | **11,63,74,000/-** |

०३. उपरोक्त बांधकामासाठी संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरूपात, टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करून दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात येईल. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

०४. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ खाली, प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१५११३१३७४६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by PATIL PRASHANT VINAYAKRAO
Date: 2023.03.15 15:18:24 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.

२) अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.), मंत्रालय, मुंबई.

३) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र -२, नागपूर.
५) विभागीय आयुक्त कार्यालय, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.
६) मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर.
८) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर.
९) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर.
१०) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, लातूर.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा लातूर.
१२) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१३) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.
१४) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, लातूर.
१५) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, उदगीर, जि. लातूर.
१६) सभापती, पंचायत समिती, उदगीर, जि. लातूर.
१७) वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१६), मंत्रालय, मुंबई.
१८) नियोजन विभाग (का.१४४४), मंत्रालय, मुंबई.
१९) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई.
२०) कार्यासन वित्त-१ व योजना-७, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) निवडनस्ती, कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.